**जलसंपदा विभागातंर्गत महामंडळे व त्याअंतर्गत असलेल्या कार्यालयांचे लेख्यांचे संगणकीकरण.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रं. संकीर्ण-२०१७/( १२/२०१७)/लेखा**
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक-१६/०५/२०१७

**वाचा :** शासन निर्णय क्रं संकिर्ण-२०१४/(३८/२०१४)/लेखा, दि. २२/०७/२०१५.

**प्रस्तावना**

जलसंपदा विभागांतर्गत महामंडळे व त्याअंतर्गत कार्यालयांच्या लेखे व अनुषंगिक अभिलेखांमध्ये एकसुत्रीपणा आणणे, त्याद्वारे उपलब्ध होणाऱ्या माहितीची मांडणी अधिक उपयुक्त व वापर सुलभ करणे व लेख्यांचे तत्परतेने अद्ययावतीकरण करणे शक्य व्हावे याकरिता महामंडळांचे लेख्यांचे संगणकीकरण करण्यासंदर्भात आवश्यक सुचना शासन निर्णय **वाचा**नुसार देण्यात आलेल्या आहेत.

शासन स्तरावरुन महामंडळ व तेथुन अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांना होणारे निधी वाटप व त्यातुन केला जाणारा खर्च यावर अधिक प्रभावी नियंत्रण राखणे शक्य व्हावे याद्दष्टीने शासन स्तरावर वापरात असलेल्या Budget Estimation, Allocation And Monitering System व Goverment Receipt Accounting System सारखी प्रणाली व यासह प्रत्यक्ष खर्चाचे लेखे व त्यावर नियंत्रण ठेवणे शक्य होईल अशी आज्ञावली/प्रणाली विकसीत केल्यास संगणकीकरणाचा हेतू सफल होईल. प्रस्तावित प्रणालीमध्ये प्रामुख्याने खालील बाबी अंतर्भूत असतील असे अपेक्षित आहे, मात्र आवश्यकतेनुसार उपयुक्तता व सुलभता या हेतुने त्यामध्ये बदल/वाढ करणे आवश्यक आहे.

१. महामंडळास विविध स्त्रोतातुन प्राप्त होणारा निधी.
२. महामंडळाकडे विभाग व मंडळ कार्यालयाकडून प्राप्त होणारी अनुदानाची मागणी
३. महामंडळ/क्षेत्रीय कार्यालयाकडुन निधीचे वाटप
४. महामंडळ/क्षेत्रीय कार्यालयांकडुन होणारे खर्च
५. प्रयोजननिहाय निधी उपलब्धता व खर्च यांचे लेखे/अभिलेख.
६. जमा/खर्च व खात्यांमधील नोंदींचा ताळमेळ
७. विविध स्तरांवर नियतकालीक अहवाल उपलब्ध करुन देणे.

उपरोक्तप्रमाणे प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याच्या हेतुने कालबद्ध कार्यक्रम निश्चित करुन तो कार्यान्वित करणे या हेतुने या विषयातील संबंधित माहितगार अधिकाऱ्यांची समिती नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार जलसंपदा विभागांतर्गत महामंडळे व त्याअंतर्गत कार्यालयांच्या लेखे व अनुषंगिक अभिलेखांमध्ये एकसुत्रीपणा आणणे, त्याद्वारे उपलब्ध होणाऱ्या माहितीची मांडणी अधिक उपयुक्त व वापर सुलभ करणे व लेख्यांचे तत्परतेने अद्ययावतीकरण करणे शक्य व्हावे याकरिता महामंडळांचे लेख्यांचे

संगणकीकरण करण्याच्या हेतुने प्रणाली विकसीत करुन कालबद्ध कार्यक्रमाद्वारे ती सर्व महामंडळांसह त्यांचे अधिनस्त कार्यालयामध्ये कार्यान्वित करण्याच्या हेतुने या विषयातील संबंधित माहितगार अधिकाऱ्यांची समिती शासन याद्वारे खालीलप्रमाणे गठीत करीत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता (जलसंपत्ती) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मुंबई | अध्यक्ष |
| २ | आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मुंबई | सदस्य |
| ३ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, कोकण सिंचन विकास महामंडळ, ठाणे | सदस्य |
| ४ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे | सदस्य |
| ५ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, गोदावरी मराठवाडा सिंचन विकास महामंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| ६ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव | सदस्य |
| ७ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | सदस्य |
| ८ | श्री. शिलानाथ जाधव (निवृत्त संचालक,लेखा व कोषागारे, महाराष्ट्र ) | सदस्य |
| ९ | अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

**समितीच्या कार्यकक्षा**

अ) प्रस्तावनेत नमुद केलेल्या मुद्यांच्या अनुषंगाने संकल्पन टिपणी विकसीत करणे.

ब) संगणकीकरणाचे परीमाणकारक व कार्यक्षमरीत्या वापर होण्याच्या दृष्टीने प्रचलित कार्यपध्दतीमध्ये सुधारणा व बदल सुचविणे.

क) प्रणालीकरीता Functional Requirements तयार करणे.

ड) निवड करावयाच्या विकसनकर्त्याची योग्यता, त्यांनी सुचविलेल्या प्रणाली मुल्यांकन करणे इ. कामाचे व्याप्तीमध्ये गरजेनुसार बदल करणे किंवा नवीन मागणी व आवश्यकता याबाबत मार्गदर्शन करणे. (Change Request)

फ) विकसीत प्रणालीचा चाचणी करून स्विकृती देणे. (User Acceptance Testing)

ग) जलसंपदा विभांगातर्गत सर्व महामंडळे व त्यांचे अधिनस्त कार्यालयात सदर प्रणाली राबविणे.

प्रस्तावित समिती सदस्यांपैकी श्री. शिलानाथ जाधव (निवृत्त संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र) यांना प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय मानधन व भत्ता देय राहील. समितीच्या बैठका घेताना मुंबई स्थित नसलेल्या जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत असलेल्या सदस्यांना शक्यतो व्हिडीओ कॉन्फरन्सद्वारे बैठकीमध्ये सहभागी करुन घेण्यात यावे. समितीच्या कामकाजासाठी आवश्यक असणारा खर्च अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मंत्रालय, मुंबई यांना कार्यालयीन खर्च या प्रयोजनासाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचा www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०५१७१२३१५८४२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Prashant Jagadish Sajanikar

Digitally signed by Prashant Jagadish Sajanikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prashant Jagadish Sajanikar
Date: 2017.05.17 12:35:56 +05'30'

**(प्रशांत साजणीकर)**
**आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा .मंत्री. जलसंपदा, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव.

२) मा .राज्यमंत्री. जलसंपदा, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव.

३) प्रधान सचिव (जसप्र व वि). जलसंपदा विभाग व मंत्रालय,मुंबई यांचे स्विय सहाय्यक.

४) प्रधान सचिव (मा.तं), माहिती तंत्रज्ञान विभाग, ७ वा मजला, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.

५) प्रधान सचिव (जसंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.

६) प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.

७) सचिव (प्रकल्प समन्वय), मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.

८) सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग

९) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

१०) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय. मुंबई.

११) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.

१२) सर्व अधीक्षक अभियंता व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.

१४) अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मंत्रालय, मुंबई

१५) लेखा कार्यासन संग्रहार्थ.